el

**प्रशासकीय मान्यता-**
मौजे विटा, ता.खानापूर, जि.सांगली येथे न्यायालयीन इमारत भाग-२ व ३च्या बांधकामाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीसीबी ३००७/९४०/प्र.क्र.१०३-का.१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि.१५ नोव्हेंबर, २००७.

**पहा :-** १) अपर प्रबंधक, उच्च न्यायालय (निरीक्षणे), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यू)६०४३/१९८३, दि.१७ जुलै, २००७.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा न्यायालय, सांगली यांचे पत्र क्र.५७३१, दि.५.१०.२००६.

**शासन निर्णय** :- मौजे विटा, ता.खानापूर, जि.सांगली येथे न्यायालयीन इमारतीच्या भाग-२ व भाग-३च्या बांधकामास येणारा खर्च रु.१,९५,७९,२००/-(रु.एक कोटी पंच्याण्णव लक्ष एकोणऐंशी हजार दोनशे फक्त) इतक्या अंदाजित खर्चास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य इमारत भाग २ व ३ | १,१३,८१,२३८ |
| २ | आवारभिंत | १,२२,२९० |
| ३ | इमारत पाडणे | ६६,०११ |
| ४ | आकस्मिक खर्च ४% | ४,६२,७८२ |
| ५ | सन २००६-०७ ते सन २००७-०८ दरसूचीतील वाढ १५% | १७,३५,४३० |
| ६ | रेन वॉटर हार्वेस्टींग | ३,००,००० |
| ७ | पाणी पुरवठा व मलनि:सारण ८% | ९,१०,४९९ |
| ८ | विद्युतीकरण ९% | १०,२४,३११ |
| ९ | फर्निचर | २४,४५,२१४ |
| १० | किंमतीतील वाढ १०% | ११,५६,९५४ |
| | **वजा- पाडण्यात येणा-या इमारतीमधून प्राप्त होणा-या सामानाचे मूल्य**<br>**एकूण** | **१,९६,०४,७२९**<br>**-२५,५३४**<br>**१,९५,७९,१९५**<br>**म्हणजेच १,९५,७९,२००** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

" प्रस्तुत इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मांडणी नकाशा तयार करुन घेतल्यावरच सुरु करावे."

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक :-२६६/इमा-२, दि.१३ नोव्हेंबर,२००७ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. :-विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै २००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( र. ग. पांचाळ )**
**कार्यासन अधिकारी.**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सांगली,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा)-दोन , महाराष्ट्र, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सांगली,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सांगली
(मुळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, विटा, ता.खानापूर, जि.सांगली,
जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली,
उप कोषागार अधिकारी, सांगली ,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
महासंचालक , माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
कक्ष अधिकारी, का.११ व १२, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती.